महिला बचत गटांच्या नाविन्यपूर्ण उद्योग संकल्पनांना प्रोत्साहित करण्यासाठी “हिरकणी-नवउद्योजक महाराष्ट्राची” योजनेस मान्यता देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१९/प्र.क्र.१०/अभियान-१,**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २१, फेब्रुवारी, २०१९.

<u>वाचा</u> : १) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक जिनाप-२११४/प्र.क्र.२/२०१४/१४७१, दिनांक १४/०८/२०१४.
२) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१७/प्र.क्र.२४३/अभियान-१, दिनांक ०५/०२/२०१८.

**<u>प्रस्तावना</u> :**

“स्वयंसहाय्यता बचत गट” ही संकल्पना सर्वसमावेशक आहे. तथापि, बचत गट म्हणजे महिला बचत गट असे समीकरणच तयार झाले आहे. बचत गटांच्या प्रगतीमध्ये महिलांचे सर्वात जास्त योगदान आहे. बचत गटांच्या माध्यमातून राज्यात महिला व्यवसायिकांची एक चळवळच उभी राहिली असून राज्यातील प्रत्येक जिल्ह्यात विविध बचत गट कार्यरत आहेत. सदर बचत गटाच्या माध्यमातून तळागाळातील स्त्री आर्थिक स्वावलंबनाच्या दिशेने यशस्वी वाटचाल करत आहे.

राज्याच्या औद्योगिक तसेच आर्थिक विकासास चालना देण्यासाठी आणि देशातील बेरोजगारीच्या समस्येवर उपाययोजना करण्यासाठी नाविन्यपूर्ण संकल्पांवर आधारीत उद्योगांना प्रोत्साहन देण्याकरिता विभागाच्या दिनांक ०५/०२/२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये “महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्ट-अप धोरण, २०१८ (Maharashtra State Innovative Start-up Policy, 2018)” ला मान्यता देण्यात आली आहे. सदर धोरणाच्या अनुषंगाने महिला बचत गटांच्या नाविन्यपूर्ण उद्योग संकल्पनांना प्रोत्साहित करुन स्टार्ट-अप संस्कृतीचा विकास करण्यासाठी “हिरकणी - नवउद्योजक महाराष्ट्राची” योजना मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्याच्या औद्योगिक तसेच आर्थिक विकासास चालना देण्यासाठी आणि देशातील बेरोजगारीच्या समस्येवर उपाययोजना करण्यासाठी नाविन्यपूर्ण संकल्पांवर आधारीत उद्योगांना प्रोत्साहन देण्याकरिता “महाराष्ट्र राज्य नाविन्यपूर्ण स्टार्ट-अप धोरण, २०१८ (Maharashtra State Innovative Start-up Policy, 2018)” मंजूर करण्यात आले आहे. सदर धोरणाच्या अनुषंगाने राज्यातील महिला बचत गटांना स्टार्टअपच्या माध्यमातून उद्योजक बनण्यास प्रोत्साहित करण्याकरिता राज्यात “**हिरकणी - नवउद्योजक महाराष्ट्राची**” योजना राबविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**१. योजनेचा उद्देश**

महिला बचत गटांच्या नाविन्यपूर्ण संकल्पनांना प्रोत्साहीत करण्यासाठी त्यांना आवश्यक ते मार्गदर्शन करणे, तालुका व जिल्हा स्तरावर मंच उपलब्ध करुन देणे व उत्कृष्ट नाविन्यपूर्ण संकल्पनांना पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी अर्थसहाय्य करणे हा या योजनेचा प्रमुख उद्देश आहे.

**२. योजनेचे लाभार्थी**

राज्यातील राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान (National Rural Livelihood Mission-NRLM), राष्ट्रीय शहरी जीवनोन्नती अभियान (National Urban Livelihood Mission-NULM) व महिला आर्थिक विकास महामंडळ (MAVIM) अंतर्गत किमान एक वर्षापूर्वी स्थापन करण्यात आलेले व राष्ट्रीय जीवनोन्नती अभियानातील पंचसूत्रीचे पालन करणारे महिला बचत गट हे या योजनेचे लाभार्थी असतील. या व्यतिरिक्त राज्य व केंद्र शासनाचे इतर विभागाद्वारे राज्य किंवा केंद्र शासनाची इतर काही योजनेंतर्गत किमान एक वर्षापूर्वी तयार करण्यात आलेली व पंचसूत्रीचे पालन करणाऱ्या महिला बचत गटांचा समावेश करण्याविषयी जिल्हा नाविन्यता परिषद निर्णय घेवू शकेल.

**३. अंमलबजावणी यंत्रणा**

सदर योजनेची जिल्हा स्तरावर अंमलबजावणी नियोजन विभागाच्या दिनांक १४/०८/२०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या जिल्हा नाविन्यता परिषदेमार्फत करण्यात येईल व तालुका स्तरावरील अंमलबजावणीकरिता प्रत्येक तालुक्यात तालुकास्तरीय समिती गठीत करण्यात येईल.

**तालुकास्तरीय समिती**

| | | | |
|---|---|---|---|
| १. | तहसिलदार | - | अध्यक्ष |
| २. | गट विकास अधिकारी | - | सह अध्यक्ष |
| ३. | तालुका महिला व बालविकास अधिकारी * | - | सदस्य |
| ४. | तालुकास्तरीय अग्रणी बँक व्यवस्थापक | - | सदस्य |
| ५. | सहाय्यक गट विकास अधिकारी | - | सदस्य सचिव |

**४. योजनेची कार्यपद्धती**

१) सदर योजनेंतर्गत महिला बचत गटांना त्यांच्या नाविन्यपूर्ण संकल्पना प्रदर्शित करण्यासाठी तालुका स्तरावर मंच उपलब्ध करुन देण्यात येईल.

२) सदर संकल्पनांना उद्योगात रुपांतरीत करण्याकरिता तालुका स्तरावर मार्गदर्शन करण्यात येईल व त्यातील निवडक संकल्पनांची १०० च्या मर्यादेत तालुका मंचावर सादरीकरणासाठी निवड करण्यात येईल.

३) सदर संकल्पनांचे तालुकास्तरीय समितीद्वारे परीक्षण करण्यात येईल.

४) तालुकास्तरीय समितीच्या परीक्षणाअंती निवडयोग्य ठरलेल्या नाविन्यपूर्ण संकल्पनांमधून उत्कृष्ट नाविन्यपूर्ण संकल्पनांची १० च्या मर्यादेत निवड करण्यात येईल.

५) निवड केलेल्या उत्कृष्ट संकल्पना प्रत्यक्ष साकारण्यासाठी आवश्यक पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी प्रत्येक प्रकल्पास रुपये ५०,०००/- च्या मर्यादेत अर्थसहाय्य करण्यात येईल.

६) तालुका स्तरावर निवड झालेल्या नाविन्यपूर्ण संकल्पना जिल्हास्तरीय मंचावर सादरीकरणास पात्र ठरतील व त्यांना जिल्हा स्तरावर सादरीकरणाची संधी देण्यात येईल.

७) जिल्हास्तरीय मंचावर जिल्ह्यातील यशस्वी उद्योजक, व्यावसायिक, गुंतवणूकदार, बँका इत्यादींना (किमान पाच) आमंत्रित करण्यात येईल.

८) जिल्हास्तरीय मंचावरील नाविन्यपूर्ण संकल्पनांचे वरील आमंत्रिताद्वारे व जिल्हा नाविन्यता परिषदेद्वारे परीक्षण करण्यात येईल.

९) परीक्षणाअंती निवडयोग्य ठरलेल्या नाविन्यपूर्ण संकल्पनांमधून उत्कृष्ट नाविन्यपूर्ण संकल्पनांची १० च्या मर्यादेत निवड करण्यात येईल.

१०) निवड केलेल्या उत्कृष्ट संकल्पना प्रत्यक्ष साकारण्यासाठी आवश्यक पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी प्रत्येक प्रकल्पास रुपये २.०० लाख च्या मर्यादेत अर्थसहाय्य करण्यात येईल.

११) जिल्हास्तरीय मंचावर नाविन्यपूर्ण संकल्पना प्रदर्शित करण्याकरिता तालुका स्तरावर निवडलेल्या महिला बचत गटांना रुपये २,५००/- च्या मर्यादेत प्रोत्साहन भत्ता अदा करण्यात येईल.

१२) जिल्हा स्तरावर निवड झालेल्या प्रकल्पाकरिता जिल्हा नाविन्यता परिषदेमार्फत मार्गदर्शन (Mentoring) करण्यात येईल.

१३) सदर योजनेकरिता येणारा खर्च नियोजन विभागाच्या दिनांक २७/०६/२०१४ रोजीच्या शासन निर्णयानुसार जिल्हा वार्षिक योजनेंतर्गंत जिल्हा इनोव्हेशन कौन्सिलसाठी उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा. तथापि, सदर निधीतून खर्च करण्यास जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती यांची मान्यता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४७/१४७१ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७५/२०१९/व्यय-८, दिनांक १५/०२/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२११७५४५८२००३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development And Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d101a905c7fca95ea9a4a68053d53dda9fcd8b54a203c383517611e96421b187, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2019.02.21 17:57:34 +05'30'

**( ब.शो.मांडवे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४. मा.राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. सर्व विधानपरिषद/विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,
७. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व विभाग.
९. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई,
१०. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता-१), महाराष्ट्र, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता-२), महाराष्ट्र, नागपूर,
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा-१), महाराष्ट्र, मुंबई,
१५. महालेखापाल (लेखा परीक्षा-२), महाराष्ट्र, नागपूर,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१९. सर्व विभागीय आयुक्त,
२०. सर्व जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती.
२१. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
२२. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२३. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
२४. उपसंचालक, विभागीय मुख्यालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर,
२५. निवड नस्ती.